सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाच्या अखत्यारीत असलेल्या संस्थेमधील अल्पमुदतीचे अभ्यासक्रम बंद करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०२२/(प्र.क्र.०५/२२)/तांशि-५**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २२ जून, २०२३

वाचा :- १) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र जा.क्र.१०/एनजीपी/अल्पमुदत/अभ्या.बंद/२०२१/९८४, दि.२७/१२/२०२१.
२) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र जा.क्र.१०/एनजीपी/अल्पमुदत/अभ्या.बंद/२०२२/१०५, दि.०१/०२/२०२३.
३) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र जा.क्र.१०/एनजीपी/अल्पमुदत/ अभ्या.बंद/२०२३/ ४२६, दिनांक ०८/०६/२०२३.
४) सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ यांचे ना हरकत प्रमाणपत्र दि.२०.०४.२०१६

**प्रस्तावना :-**

सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाच्या अखत्यारीत असलेल्या श्री चाणक्य एज्युकेशन सोसायटी, पुणे संचलित इंदिरा कॉलेज ऑफ बिझनेस मॅनेजर्मेट, पुणे या संस्थेमधील अल्प मुदतीचे अभ्यासक्रम बंद करण्याबाबत तंत्रशिक्षण संचालनालय यांनी उपरोक्त संदर्भाधिन पत्र क्र. १ ते ३ अन्वये शासनास विनंती केलेली आहे. संस्थेतील अल्पमुदतीचे अभ्यासक्रम बंद करण्याबाबत सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाने संदर्भ क्र.४ अन्वये ना-हरकत प्रमाणपत्र दिले आहे. सदर विनंतीस अनुसरुन संस्थेतील अल्प मुदतीचे अभ्यासक्रम बंद करण्यास शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे यांच्या अखत्यारीत असलेल्या खालील **"प्रपत्र-अ"** मध्ये नमुद संस्थेतील अभ्यासक्रम शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासुन बंद करण्यास खालील अटी व शर्तींचे अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**प्रपत्र-अ**

| अ.क्र. | संस्थेचे नाव | अभ्यासक्रमाचे नाव | प्रवेश क्षमता |
|---|---|---|---|
| १ | श्री चाणक्य एज्युकेशन सोसायटी, पुणे संचलित इंदिरा कॉलेज ऑफ बिझनेस मॅनेजर्मेट, ४, गणेशखिंड रोड, पुणे | पोस्ट ग्रॅज्युएट डिप्लोमा इन बिझनेस मॅनेजमेंट (PGDBM), | १२० |
| | | पोस्ट ग्रॅज्युएट डिप्लोमा इन इम्पोर्ट एक्सपोर्ट मॅनेजमेंट (PGDIEM), | ३० |
| | | पोस्ट ग्रॅज्युएट डिप्लोमा इन कॉम्प्युटर मॅनेजमेंट (PGDCM), | ३० |
| | | मास्टर इन बिझनेस स्टडीज (MBS) | ६० |

१. या संस्थेतील बंद करावयाच्या अभ्यासक्रमांच्या संबंधित सर्व दस्ताऐवज जसे की, गुणपत्रिका, उत्तरपत्रिका, निकालपत्र, विद्यार्थ्यांचे पत्ते, फीच्या पावत्या, इत्यादी बाबी संस्थेने संचलनालयाकडे सूपूर्द करणे आवश्यक राहील.
२. संबंधित अभ्यासक्रमासाठी नियुक्त शिक्षक वर्ग/कर्मचारी यांच्या सेवाविषयक व इतर बाबतीत न्यायप्रविष्ठ असलेली सर्व प्रकरणांची जबाबदारी संस्था प्रमुखांची राहील. भविष्यात कोणतेही न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास त्यास सर्वस्वी संस्था जबाबदार राहील.

३. संस्थेकडून शासनाची वसुली अद्यापी थकबाकी असल्यास त्याचा भरणा करणे संस्था प्रमुखांवर बंधनकारक राहील.

४. संस्थेमध्ये सदर अभ्यासक्रम राबविण्यासाठी आवश्यक स्थरावर जंगम मालमत्तेविषयी या संस्थेने शासनाकडून किंवा कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेतलेले असल्याचे यापुढे निदर्शनास आल्यास त्याची परतफेड करण्याची सर्वस्वी जबाबदारी संस्थेची राहील.

५. संस्थेतील संबंधित अभ्यासक्रम बंद केल्यानंतर त्या संस्थेतील प्रवेशित विद्यार्थ्यांना व माजी विद्यार्थ्यांना परीक्षेस बसण्याची इच्छा असल्यास त्याची पर्यायी व्यवस्था करणे संस्थांवर बंधनकारक राहील.

६. संबंधित अभ्यासक्रमासाठी नियुक्त केलेल्या संस्थेतील शिक्षक व कर्मचारी यांना देय असलेले वेतन, वेतन भरपाई व अन्य आर्थिक प्रदानाचे भुगतान करणे संस्थेस बंधनकारक राहील.

७. संबंधित संस्थेने उपरोक्त अभ्यासक्रम सुरु करण्यासाठी शासनाकडे जमा केलेली नियतठेव संस्थेच्या खाती वर्ग करण्याची पुढील कार्यवाही करावी.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६२२१६३७२४७३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL RAGHUNATH KATKAR

Digitally signed by ANIL RAGHUNATH KATKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3fec0b0f5c05dc9058175992109e62d3f5719b9dfb87a96579dc30c265d67ce, pseudonym=75C11252335D0BA578468AE6E544C11FDBC35C9A, serialNumber=2356D82C73E8A0C7B6DA68B6511197206B94720842CDA576FEBEBF84581FC52A, cn=ANIL RAGHUNATH KATKAR
Date: 2023.06.22 16:39:26 +05'30'

**(अ. र. काटकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

२. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, वांद्रे (पुर्व), मुंबई,

३. प्रबंधक, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे (तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचेमार्फत)

४. संबंधित संस्था (तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचेमार्फत),

५. निवड नस्ती / तांशि-५.